



PRATHAM BOOKS
A Book in Every Child's Hand

# गुल्लीचा खजिना

**Author:** Anupama Ajinkya Apte
**Illustrator:** Anupama Ajinkya Apte
**Translator:** Shruti Panse

वाचन पातळी २



“काय झालंय आजोबा? पेपर का वाचत नाही तुम्ही आज?” एके दिवशी सकाळी गुल्लीनं आजोबांना विचारलं.
“अरे बाळा, माझा चष्मा तुटलाय. चष्म्याशिवाय मी काहीच वाचू शकत नाही.” आजोबा म्हणाले.





“अरेच्या! असं झालं होय! काही काळजी करू नका. माझा सगळा खजिना ठेवलेलं खोकं आणतो मी.”
गुल्ली पटकन पळत गेला. त्यानं त्याचं छोटसं चॉकलेटी रंगाचं खोकं आणलं.



खण... खण्ण्ण... खाड खुड...
गुल्लीला काय सापडलं?
एक चमकदार भिंग.
तुम्ही जर या भिंगातून नीट बघितलंत तर कोणतीही वस्तू तुम्हाला जास्त मोठी आणि छान दिसेल.



“अरे, खरंच की! छानच झालं हे! यातून मला अगदी प्रत्येक शब्द व्यवस्थित वाचता येतोय.” आजोबा म्हणाले.



“काय झालं मंगलचाचा?” एका रविवारी गुल्लीनं विचारलं.
“अरे, मला या पिशवीतून बाटलीत तेल भरायचंय; पण बघ ना, किती छोटंय बाटलीचं तोंड! स्वयंपाकघर सगळं चिकट, घाण होऊन जाणार आता.” मंगलचाचा म्हणाले.
“तुम्ही काही काळजी करू नका हो! मी तुम्हाला पटकन काहीतरी शोधून देतो.” गुल्ली म्हणाला.



खण... खण्ण्ण... खाड खुड...
बघूया तरी, या वेळी काय सापडतंय गुल्लीला!
हे तर मोठ्या तोंडाचं नरसाळं.



वरून तुम्ही काहीही ओता आणि मग बघा, सगळं कसं नीट, थेंब थेंब खाली येतं ते!
“हे घ्या मंगलचाचा, बघा तर वापरून. तुमचं स्वयंपाकघर ठेवेल स्वच्छ आणि मग तुम्ही स्वयंपाक कराल मस्त!”



“कित्ती छान रे गुल्ली, बरं झालं तू मला मदत केलीस.”



“काय शोधते आहेस आजी?” गुल्लीनं विचारलं.

“अरे, मी इथे आजोबांसाठी शिवत होते माकडटोपी. तर खाली पडली की रे माझी सुई.” आजी म्हणाली.

“अग आजी, तू बस या आरामखुर्चीत, मी बघतो काय सापडतंय ते माझ्या छोट्याशा चॉकलेटी खोक्यात.” गुल्ली म्हणाला.




खण... खण्णण... खाड खुड...
काय बरं सापडलं गुल्लीला?
हे तर चुंबक! कुठलीही लोखंडाची वस्तू या चुंबकाला चिकटतेच.
“मी जरा तपासतो जमिनीवर, म्हणजे तुझी सुई सापडेल झटकन.” गुल्ली म्हणाला.




“हे बघ आजी, तुझी सुई कशी याला चिकटली आणि बाकीच्या कधीपासून हरवलेल्या लोखंडी वस्तूसुद्धा सापडल्या बघ.” गुल्ली म्हणाला.
“खरंच ! तू किती शहाणा आहेस आणि तुझ्या खोक्यातला तो खजिनासुद्धा किती छान आहे.” आजी म्हणाली.

## Story Attribution:

This story: गुल्लीचा खजिना is translated by Shruti Panse . The © for this translation lies with Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'Gulli's Box of Things', by Anupama Ajinkya Apte . © Pratham Books , 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books. Pratham Books is a not-for-profit organization that publishes books in multiple Indian languages to promote reading among children. www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: A boy carrying a box and surrounded by his family by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: A boy and an old man with a newspaper in his handby Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Boy running and carrying a box, by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Boy using a magnifying glass, by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Boy and an old man using a magnifying glass to read, by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Boy and man in the kitchen, by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Boy sifting through a box, by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Boy holding a funnel and dancing, by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Boy eating and man pouring oil in a kitchen, by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: Boy with a cricket bat and old woman, by Anupama Ajinkya Apte © Pratham Books, 2011. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.





# गुल्लीचा खजिना
(Marathi)

गुल्लीकडे एक चॉकलेटी रंगाचं खोकं आहे. त्यात त्यानं कसला कसला खजिना दडवलाय. बटणं, पिना आणि अजून काय काय...! काय करतो तो या वस्तूंचं? बघा बरं, मग तुम्हालाही वाटेल की आपल्याकडेही असा खजिना असावा!

या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे. ओळखीचे शब्द जाणून वाचणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

